**कनिष्ट स्तर गट - अ आणि गट - ब च्या राजपत्रित अधिका-यांचे वयाच्या ५० / ५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा कालावधीच्या पुढे शासन सेवेत राहण्याची पात्रता अजमावण्यासाठी करावयाच्या पुनर्विलोकनाबाबत तसेच पुनर्विलोकनाअंती मुदतपूर्व सेवानिवृत्त केलेल्या अशा अधिका-यांनी सादर केलेल्या अभिवेदनाबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र.विपुस-१०९९/प्र.क्र. ५८/९९/१५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ सप्टेंबर १९९९.

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरसी-१०७६/५८०/१५, दिनांक ८ एप्रिल, १९७६,
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरसी-१०७९/३०३/१५, दिनांक २४ ऑक्टोबर, १९७९,
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दिनांक १२ मे, १९८६,
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण-१०८९/प्र.क्र.४१/१५, दिनांक १५ मे, १९९०,
५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरसी-१०८९/प्र.क्र.३३/८९/१५, दिनांक १४ जानेवारी, १९९२,
६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.विपुस-१०९२/प्र.क्र.२०/९२/१५, दिनांक १८ ऑक्टोबर, १९९३.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र नागरी सेवा ( निवृत्तीवेतन ) नियम - १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचारी यांना वयाच्या ५० / ५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा कालावधीच्या पुढे पुनर्विलोकनाअंती निर्णय घेऊन त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे.

२. गट-अ आणि गट-ब च्या राजपत्रित अधिका-यांच्या पुनर्विलोकनाचे अधिकार शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.विपुस-१०९२/प्र.क्र.२०/९२/१५, दिनांक १८ ऑक्टोबर, १९९३ अन्वये मंत्रालयीन विभागांना देण्यात आलेले आहेत. पुनर्विलोकनाअंती ज्या अधिका-यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याची विभागीय पुनर्विलोकन समितीने शिफारस केली असेल अशा अधिका-यांची प्रकरणे प्रचलित पध्दतीनुसार सामान्य प्रशासन विभागाकडे विशेष पुनर्विलोकन समितीपुढे सादर करण्यासाठी पाठविण्यात येतात.

३. शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, कनिष्ट स्तर गट-अ (नवीन वेतनश्रेणी रु. ७४५० - ११५०० ) आणि गट-ब च्या राजपत्रित अधिका-यांच्या पुनर्विलोकनासंबंधीचे पूर्णतः अधिकार मंत्रालयीन विभागांना देण्यात येत आहेत. मंत्रालयीन विभागांनी पुनर्विलोकन प्रकरणी निर्णय घेतांना शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरसी-१०७९/३०३/१५, दिनांक २४ ऑक्टोबर, १९७९, शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दिनांक १२ मे, १९८६, आणि शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरसी-१०८९/प्र.क्र.३३/८९/१५, दिनांक १४ जानेवारी, १९९२ मध्ये विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करावा. पुनर्विलोकनाअंती ज्या अधिका-यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याचा निर्णय घेतला असेल अशा अधिका-यांबाबत कार्यवाही करतांना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या खाली नमूद केलेल्या आदेशातील सूचनाही अवश्य विचारात घ्याव्यात.

१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-११६८/४५३/डी-१,
दिनांक २५ ऑक्टोबर, १९६८,
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरसी-१०७६/५८०/१५,
दिनांक ८ एप्रिल, १९७६,
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरसी-१०७९/३०३/१५,
दिनांक २४ ऑक्टोबर, १९७९,
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पीईएन-१०८३/सीआर-१२९६/८३/एसईआर-४,
दिनांक १ ऑक्टोबर, १९८४,
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०८७/सीआर-५१३/सेवा-४,
दिनांक ९ जुलै, १९८७.

४. शासनाने पुढे असाही निर्णय घेतला आहे की, कनिष्ट स्तर गट - अ ( नवीन वेतनश्रेणी रु. ७४५० - ११५०० ) आणि गट - ब च्या ज्या अधिका-यांना मुदतपूर्व सेवानिवृत्तीची नोटीस दिलेली आहे अशा अधिका-यांनी त्या नोटीस विरुध्द अभिवेदन सादर केल्यास त्यांच्या अभिवेदनावरील कार्यवाहीसंबंधीचेही पूर्ण अधिकार मंत्रालयीन विभागांना देण्यात येत आहेत. मंत्रालयीन विभागांनी अभिवेदनावरील शिफारशीसाठी खालीलप्रमाणे अभिवेदन समिती विभागात गठीत करावी.

| | | |
|---|---|---|
| १) मंत्रालयीन विभागाचे सचिव | - | अध्यक्ष |
| २) मंत्रालयीन विभागाचे सह/उप सचिव | - | सदस्य |
| ३) मंत्रालयीन विभागाचे अवर सचिव | - | सदस्य सचिव |

( अ.क्र.२ आणि क्र.३ वरील अधिकारी हे
विभागातील पुनर्विलोकन समितीमधील
अधिका-यां व्यतिरिक्त असावेत. )

५. अभिवेदनासंबंधीची कार्यवाही करतांना वेळोवेळी दिलेल्या आदेशांमधील कार्यपध्दतीचा अवलंब करावा. अभिवेदन समितीच्या शिफारशीवर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरसी-१०८९/प्र.क्र.३३/८९/१५, दिनांक १४ जानेवारी, १९९२ च्या आदेशांनुसार शासनाची मान्यता घेऊन संबंधितांस शासनाचा निर्णय कळवावा.

६. वरीष्ठ स्तर गट - अ मधील अधिका-यांची पुनर्विलोकनाची / अभिवेदनाची प्रकरणे पूर्वीप्रमाणेच सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( मीरा डफळापूरकर )
शासनाच्या उप सचिव.

प्रत :-
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहाय्यक,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती.